**चंद्रपूर जिल्हयातील मानव-व्याघ्र संघर्ष कमी करण्याकरिता उपशमन योजना सुचविण्यासाठी तांत्रिक अभ्यासगट स्थापन करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.०९२०/प्र.क्र.१५२/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०७ ऑक्टोंबर २०२०

वाचा:-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२३(४)/डब्ल्यूएल/प्र.क्र.(२०२०- २१)/१०७८, नागपूर दिनांक ०१.०९.२०२०.

२) शासन पत्र दि. डब्ल्यूएलपी-०७२०/प्र.क्र.९३/फ-१, दिनांक ०९.०९.२०२०.

**प्रस्तावना :-**

चंद्रपूर जिल्हयातील वाघांच्या संख्येत होणारी विस्मयकारक वाढ आणि बछडयांचे जिवंत राहण्याचे व त्यांचे वयस्कामध्ये रुपांतर होण्याचे प्रमाणामुळे धोकादायक परिस्थिती उदभवत आहे, ज्यामुळे मानव-वन्यजीव संघर्ष हा गंभीर प्रमाणात वाढत आहे. तरुण वाघांचे मानवी प्राबल्य असलेल्या भुभागाकडे पसरणेचे प्रयत्न सतत सुरु असल्यामुळे, त्यातुन मानव-वन्यजीव संघर्ष निर्माण होवून मनुष्य मृत्यूच्या घटनांमध्ये वाढ झालेली आहे. सदर प्रकरणी राज्य वन्यजीव मंडळाचे दिनांक ७ ऑगस्ट, २०२० रोजी संपन्न झालेल्या १५ व्या बैठकीत चंद्रपूर जिल्हयातील वाघांच्या संख्येवर नियंत्रण ठेवणे व मानव-व्याघ्र संषर्ध कमी करण्याकरीता प्रस्तावीत व्यवस्थापकीय हस्तक्षेपाबाबत चर्चा करण्यात आली. उपरोक्त परिस्थितीची बारकाईने पाहणी करण्याकरीता वन्यजीव व्यवस्थापन, वाघ संनियत्रण, स्थानिकांच्या उपजिविकेचे प्रश्न, सामाजिक व आर्थिक मुद्दे या विषयांशी संबंधित तज्ज्ञ व अशासकीय सदस्यांचा समावेश असलेला तांत्रिक अभ्यासगट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर जिल्हयातील वाघांच्या संख्येवर नियंत्रण ठेवणे व मानव-व्याघ्र संषर्ध कमी करण्याकरीता प्रस्तावीत व्यवस्थापकीय हस्तक्षेपाबाबत वन्यजीव व्यवस्थापन, वाघ संनियत्रण, स्थानिकांच्या उपजिविकेचे प्रश्न, सामाजिक व आर्थिक मुद्दे या विषयांशी संबंधित तज्ज्ञ व अशासकीय सदस्यांचा समावेश असलेला ११ सदस्यीय तांत्रिक अभ्यासगट खालीलप्रमाणे स्थापन करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नांव | पद |
|---|---|---|
| १ | श्री. एन. आर. प्रविण, मुख्य वनसंरक्षक (प्रा), चंद्रपूर | अध्यक्ष |
| २ | डॉ. जितेंद्र रामगावकर, वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर | सदस्य |
| ३ | श्री. कुलराज सिंग, उपवनसंरक्षक (प्रा), गोंदिया वन विभाग, गोंदिया | सदस्य सचिव |
| ४ | डॉ. बिलाल हबीब, शास्त्रज्ञ, भारतीय वन्यजीव संस्थान, डेहराडून | सदस्य |
| ५ | श्री. संजय एल ठावरे, वनसंरक्षक (सेवानिवृत्त) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६ | श्री. गिरीश वशीष्ट, विभागीय वन अधिकारी (सेवानिवृत्त) | सदस्य |
| ७ | डॉ. विद्या अत्रेय, संवर्धन अभ्यासक | सदस्य |
| ८ | डॉ. अनिश अंधेरीया, अभ्यासक आणि अध्यक्ष वन्यजीव संवर्धन संस्था | सदस्य |
| ९ | श्री. संजय करकरे, अभ्यासक आणि शिक्षण तज्ज्ञ, बीएनएचएस | सदस्य |
| १० | श्री. बंडू धोत्रे, सदस्य, महाराष्ट्र राज्य वन्यजीव मंडळ | सदस्य |
| ११ | श्रीमती. परोमिता गोस्मावी, संस्थापक, एल्गार प्रतिष्ठान | सदस्य |

मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाच्या वतीने श्री. युवराज एस, वनसंरक्षक (नियोजन व व्यवस्थापन- वन्यजीव), हे समन्वयक म्हणून काम पाहतील.

२. तांत्रिक अभ्यासगटाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील:-

१) चंद्रपूर जिल्हयातील मानव-व्याघ्र संघर्षाची घटना समजून घेणे आणि त्याचे विश्लेषण करणे.

२) मानव-व्याघ्र संघर्षाबाबत स्थानिक लोकांची मते जाणून घेणे.

३) मानव-व्याघ्र संघर्ष कमी करण्यासाठी यापूर्वी करण्यात आलेल्या कार्यवाहीचे विश्लेषण करणे.

४) मानव-व्याघ्र संषर्घ कमी होण्यासाठी उपशमन योजना सुचविणे.

३. अभ्यासगटाने त्यांचा स्वयंस्पष्ट अहवाल मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडे सादर करावा. मुख्य वन्यजीव रक्षक तथा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे स्पष्ट अभिप्रायासह अहवाल शासनास माहे डिसेंबर, २०२० अखेर सादर करावा.

४. अभ्यासगटामधील सेवानिवृत्त अधिकारी/ अशासकीय सदस्य यांना रुपये ८९००/- व त्याहून अधिक ग्रेड वेतन असणा-या शासकीय कर्मचा-यांच्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. मात्र त्यांना विमान प्रवास आणि रेल्वेच्या वातानुकुलीत प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१००८११३५३६५८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2020.10.08 13:14:33 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वनविभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती
६. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर
७. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व बोर व्याघ्र प्रकल्प, नागपूर
८. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर
९. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, नवेगांव-नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया
१० वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र राखीव, कोल्हापूर
११. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली
१२. उपवनसंरक्षक (प्रादेशिक), गोंदिया वन विभाग, गोंदिया
१३. डॉ. बिलाल हबीब, शास्त्रज्ञ, भारतीय वन्यजीव संस्थान, डेहराडून
१४. श्री. संजय एल ठावरे, वनसंरक्षक (सेवानिवृत्त)
१५. श्री. गिरीश वशीष्ट, विभागीय वन अधिकारी (सेवानिवृत्त)
१६. डॉ. विद्या अत्रेय, संवर्धन अभ्यासक
१७. डॉ. अनिश अंधेरीया, अभ्यासक आणि अध्यक्ष वन्यजीव संवर्धन संस्था
१८. श्री. संजय करकरे, अभ्यासक आणि शिक्षण तज्ज्ञ, बीएनएचएस
१९. श्री. बंडू धोत्रे, सदस्य, महाराष्ट्र राज्य वन्यजीव मंडळ
२०. श्रीमती. पारोमिता गोस्मावी, संस्थापक, एल्गार प्रतिष्ठान
२१. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

******